मेहकर , जिल्हा बुलढाणा येथे स्थापन करण्यात आलेल्या जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर या जोड न्यायालयांऐवजी जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर मेहकर ही दोन नियमित न्यायालये स्थापन करणे आणि या न्यायालयांसाठी पदनिर्मिती करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीबी १६९८/प्र.क्र.१४१/का.१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ४ ऑक्टोबर, २०१८

**वाचा -**

१ शासन निर्णय , विधि व न्याय विभाग क्रमांक पदनि २५१२/प्र.क्र.१५७/का.१२, दिनांक २७ जानेवारी, २०१५
२ शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक कंत्राटी २०१६/प्र.क्र.१९४/का.१२, दिनांक २३ फेब्रुवारी, २०१७
३ मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक B(W)A-१२१५ of १९८१, दिनांक ०६.०१.२०१५

**प्रस्तावना -**

मेहकर, जिल्हा बुलढाणा येथे जिल्हा न्यायाधिश व अतिरिक्त सत्र न्यायाधिश यांचे न्यायालय व दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर अशी दोन जोडन्यायालये दिनांक १८.०८.२०१३ पासून अस्तित्वात आहेत. मात्र, या जोडन्यायालयांसाठी न्यायाधिश तसेच, कर्मचा-यांची पदे निर्माण करण्यात आलेली नव्हती. सध्या ज्या न्यायाधिशांची नेमणूक बुलढाणा येथे करण्यात आली आहे, त्यांनाच त्यांचे स्वत:चे कर्मचा-यांसह मेहकर येथे १५ दिवस जाऊन कामकाज करावे लागत आहे. सदर बाब प्रलंबित दाव्यांच्या संख्येसह विचारात घेऊन मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे स्तरावर गठीत The Establishment of Courts Committee या समितीने मेहकर, जिल्हा बुलढाणा येथे अस्तित्वात असलेल्या जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर या जोडन्यायालयांऐवजी जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय मेहकर आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर मेहकर ही नियमित न्यायालये स्थापन करण्यास शासनास शिफारस केली आहे.

त्या अनुषंगाने मेहकर, जिल्हा बुलढाणा येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर यांचे अस्तित्वातील जोडन्यायालयांऐवजी नियमितरित्या जिल्हा व अतिरिक्त सत्र

न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर स्थापन करण्याची व त्याकरीता आवश्यक पद निर्मितीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे:

## शासन निर्णय-

मेहकर, जिल्हा बुलढाणा येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर यांचे अस्तित्वातील जोडन्यायालयांऐवजी नियमित स्वरुपात जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर स्थापन करण्यासाठी व या न्यायालयासाठी खाली दर्शविल्यानुसार अस्थायी पदे निर्माण करण्यास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

पहारेकरी व सफाईगार या पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे करण्यात यावी.

बुलढाणा जिल्ह्यातील अस्तित्वातील जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधिश मेहकर या जोडन्यायालयाऐवजी जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधिश मेहकर या नियमित न्यायालयासाठी पदनिर्मिती

| अ.क्र. | पदाचे नाव | पदांची संख्या | पदांची वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | जिल्हा न्यायाधिश व अतिरिक्त सत्र न्यायाधिश | १ | ५१५५०-१२३०-५८९३०-१३८०-६३०७० |
| २ | अधिक्षक | १ | ९३००-३४८०० ग्रेड पे ४६०० |
| ३ | लघुलेखक उच्चश्रेणी | १ | ९३००-३४८०० ग्रेड पे ४४०० |
| ४ | वरिष्ठ लिपिक | ४ | ५२००-२०२०० ग्रेड पे २४०० |
| ५ | कनिष्ठ लिपिक | ९ | ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० |
| ६ | बेलिफ | ३ | ५२००-२०२००- ग्रेड पे १९०० |
| ७ | शिपाई | २ | ४४४०-७४४०-ग्रेड पे १३०० |
| ८ | पुस्तक बांधणीकार | १ | ५२००-२०२००-ग्रेड पे १८०० |
| ९ | वाहनचालक | १ | ५२००-२०२००-ग्रेड पे १९०० |
| १० | पहारेकरी / सुरक्षारक्षक | -- | बाह्ययंत्रणेद्वारे |
| ११ | सफाई कामगार | -- | बाह्ययंत्रणेद्वारे |
| | एकूण | २३ नियमित व पहारेकरी / सुरक्षारक्षक बाह्ययंत्रणेद्वारे | |

बुलढाणा जिल्ह्यातील अस्तित्वातील दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर मेहकर या जोडन्यायालयाऐवजी दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर मेहकर या नियमित न्यायालयासाठी पदनिर्मिती

| अ.क्र. | पदाचे नाव | दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर मेहकर या न्यायालया तून स्थलांतराने वर्ग होणारी पदे | नव्याने निर्मा ण केलेली पदे | एकूण पदांची संख्या (वर्गीकरण केलेली पदे अंतर्भूत करुन ) | पदांची वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | दिवाणी न्यायाधिश, वरिष्ठ स्तर | -- | १ | १ | ३९५३०-९२०-४०४५०-१०८०-४९०९०-१२३०-५४०१० |
| २ | अधिक्षक | -- | १ | १ | ९३००-३४८००-ग्रेड पे - ४६०० |
| ३ | सहायक अधिक्षक | १ | १ | २ | ९३००-३४८००-ग्रेड पे ४४०० |
| ४ | लघुलेखक निम्नश्रेणी | -- | १ | १ | ९३००-३४८००-ग्रेड पे ४३०० |
| ५ | वरिष्ठ लिपिक | -- | २ | २ | ५२००-२०२००-ग्रेड पे २४०० |
| ६ | कनिष्ठ लिपिक | ५ | ३ | ८ | ५२००-२०२००-ग्रेड पे १९०० |
| ७ | प्रमुख बेलिफ | १ | ० | १ | ५२००-२०२००-ग्रेड पे २४०० |
| ८ | बेलिफ | ५ | ० | ५ | ५२००-२०२००-ग्रेड पे १९०० |
| ९ | शिपाई | -- | २ | २ | ४४४०-७४४०-ग्रेड पे १३०० |
| १० | पहारेकरी | -- | -- | -- | बाह्ययंत्रणेद्वारे |
| ११ | सफाई कामगार | -- | -- | -- | बाह्ययंत्रणेद्वारे |
|  | एकूण | १२ | ११ | २३ पदे व पहारेकरी व सुरक्षारक्षक बाह्ययंत्रणेद्वारे |  |

२. दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर मेहकर यांचे न्यायालयात दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर मेहकर यांचे न्यायालयातून वर्ग होणारी उपरोक्त १२ पदे ही दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर मेहकर यांच्या पदाच्या आकृतिबंधातून कमी करणे बंधनकारक राहील या अटीवर उपरोक्त पद निर्मिती करण्यात येत आहे.

३. उपरोक्त नमूद पदे भरण्यात आलेल्या दिनांकापासून प्रथमत: दिनांक २८ फेब्रुवारी, २०१९ पर्यंत चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत असून सदर अस्थायी पदांना दिनांक २८ फेब्रुवारी, २०१९ नंतर पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

४. यासाठी होणारा खर्च संबंधित आर्थिक वर्षात निधिची तरतुद करुन "मागणी क्रमांक जे-१, २०१४-न्यायदान (००)(१०५) दिवाणी व सत्र न्यायालये (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधिश (२०१४ ०१७२) दत्तमत" या लेखाशीर्षाखालील उद्दीष्टांसाठी अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४७३/व्यय-५, दिनांक ०१.०६.२०१८ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३५३/२०१८आपुक, दिनांक २७.०६.२०१८ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००४१७३१३०२३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: CN = Amogh Shyamkant Kaloti, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Law and Judiciary Department
Date: 2018.10.04 17:39:50 +05'30'

( अ. श्यां. कलोती )
विधि सल्लागार नि सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई,
४. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,

५. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
६. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई,
७. सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. सदस्य सचिव, विधि सेवा प्राधिकरण, मुंबई,
९. संचालक, अभियोग संचालनालय, मुंबई,
१०.प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई, नागपूर, औरंगाबाद व पणजी खंडपीठ,
११.सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालये,
१२.दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर बुलढाणा / दिवाणी न्यायालय कनिष्ठ स्तर मेहकर,
१३.सह संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, उत्तन / नागपूर,
१४.महालेखापाल १, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
१५.महालेखापाल २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
१६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१७.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा,
१९.उपजिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा,
२०.वित्त विभाग, व्यय-५ / आ.पु.क., मंत्रालय, मुंबई,
२१. विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने
२२. निवडनस्ती (का.१२)